**राज्यात संस्थात्मक कर्ज पुरवठयापासून वंचित असलेल्या शेतकऱ्यांना शेती कर्जपुरवठा करण्यासाठी उपाय योजना करण्यासाठी उच्चस्तरीय समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. जिमस ०४१७/प्र.क्र.७६/२-स**
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२
दिनांक - २८/०४/२०१७

**प्रस्तावना** -

राज्यातील शेतकऱ्यांना पीक उत्पादनासाठी विविध बँकांमार्फत अल्प मुदतीचा कर्ज पुरवठा करण्यात येत आहे. यामध्ये प्रामुख्याने जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचा व व्यापारी बॅकांचा (सार्वजनिक क्षेत्रातील बँका, खाजगी क्षेत्रातील बँका व ग्रामीण बँका) समावेश आहे. राज्यामध्ये पीककर्ज वाटप करणाऱ्या ३० जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, २३ सार्वजनिक क्षेत्रातील बँका, ८ खाजगी क्षेत्रातील बॅका व २ प्रादेशिक ग्रामीण बँका आहेत. राज्यात वेळावेळी उदभवलेल्या दुष्काळी परिस्थिती, नैसर्गिक आपत्ती इ. कारणामुळे नुकसान होऊन अनेक शेतकरी वरील संस्थांद्वारे दिलेल्या कर्जाची परतफेड करु न शकल्याने थकबाकीदार झाले आहेत. यामुळे असे शेतकरी पुढील कर्ज मिळण्यास पात्र ठरत नाहीत. तसेच काही कारणामुळे अद्यापही सुमारे २७ लाखापेक्षा जास्त शेतकरी या संस्थात्मक कर्जपुरवठयाच्या व्यवस्थेबाहेर आहेत.

वरील परिस्थिती लक्षात घेता कर्ज घेण्यास पात्र असुनही संस्थात्मक कर्जपुरवठयाचा लाभ न मिळणाऱ्या तसेच थकबाकीमुळे कर्जप्रवाहाच्या बाहेर असणाऱ्या शेतकऱ्यांना पुन्हा संस्थात्मक कर्जपुरवठा व्यवस्थेत समाविष्ट करण्यासंदर्भात उपाययोजना करणेबाबत मा. मुख्यमंत्री यांनी दि. २५/४/२०१७ रोजी नाबार्डने मुंबई येथे आयोजित केलेल्या बैठकीत सूचना दिल्या. त्या अनुषंगाने या संबंधी बाबींचा अभ्यास करुन शासनास अहवाल सादर करण्यासाठी उच्चस्तरीय समिती नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त पार्श्वभूमी विचारात घेऊन शासनाने खालीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती स्थापन करण्याचा निर्णय घेतला आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | अप्पर मुख्य सचिव, वित्त | अध्यक्ष |
| २. | अप्पर मुख्य सचिव, नियोजन | सदस्य |
| ३. | अप्पर मुख्य सचिव, सहकार | सदस्य |
| ४ | महाव्यवस्थापक, भारतीय रिझर्व्ह बँक | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव, कृषि | सदस्य |
| ६. | श्री. चंद्रकांत दळवी, विभागीय आयुक्त, पुणे | (निमंत्रित) सदस्य |
| ७. | सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ८. | मुख्य सरव्यवस्थापक, नाबार्ड | सदस्य |
| ९. | अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

१. राज्यातील यापुर्वी संस्थात्मक कर्जपुरवठा व्यवस्थेत समाविष्ट असलेले मात्र सध्या थकबाकीदार असल्यामुळे कर्ज मिळण्यास अपात्र ठरलेल्या शेतकऱ्यांना पुन्हा संस्थात्मक कर्जपुरवठा व्यवस्थेमध्ये आणण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

२. राज्यातील कर्ज मिळण्यास जे शेतकरी पात्र आहेत, परंतू ते संस्थात्मक कर्जपुरवठा व्यवस्थेच्या बाहेर आहेत. अशा शेतकऱ्यांना कर्जपुरवठा व्यवस्थेमध्ये आणण्यासाठी उपाययोजना सुचविणे.
३. उपरोक्त कार्यकक्षेच्या अनुषंगाने इतर बाबींबाबत उपाययोजना सुचविणे.

उपरोक्त मुद्दयांबाबत अभ्यास करुन समितीने ३० दिवसात शासनास अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४२९१७११२९६००२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2017.04.29 17:13:02 +05'30'

**( दि.म.राणे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत -**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री, सहकार पणन व वस्त्रोद्योग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री, सहकार यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य (सर्व)
५. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, (सहकार) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मा. प्रधान सचिव (कृषि) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. श्री. चंद्रकांत दळवी, विभागीय आयुक्त,पुणे.
११. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. महाव्यवस्थापक, भारतीय रिझर्व्ह बँक, भारतीय रिझर्व्ह बँक,मुंबई
१३. मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड , प्रादेशिक कार्यालय, पुणे
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई
१५. निवड नस्ती - २-स.